**केंद्र शासनाने दि.०९.०७.२०१९ च्या अधिनियामान्वये विहित केलेले शिक्षकीय पदांचे संवर्गनिहाय आरक्षण धोरण राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये तसेच राज्य शासनाच्या इतर विभागांच्या अधिपत्याखालील उच्च शैक्षणिक संस्थांना लागू करण्याच्या अनुषंगाने शासनास शिफारस करण्यासाठी मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.९४/१९/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३.१२.२०२१

<u>संदर्भ</u>:-

१. उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, शासन निर्णय क्र.एजीसी-१४९४/ (२९९१)/ विशि-४, दि.२४.०४.१९९५.
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.२०१३/(४४७/१३)/विशि-१,दि.२२.०१.२०१४
३. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२०१४/ (प्र.क्र.३२१/१४)/विशि-१, दि.१०.०४.२०१५ व दि.२४.०८.२०१५
४. विधि व न्याय मंत्रालय, भारत सरकार यांचा The Central Educational Institutions (Reservation in Teachers Cadre) Act, 2019.

**<u>प्रस्तावना</u>:-**

शासकीय महाविद्यालयातील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट “अ”मधील अधिव्याख्यात्यांनी महाविद्यालयामध्ये अधिव्याख्याता (सहायक प्राध्यापक) पदावर नियुक्ती करतांना विषयनिहाय आरक्षण ठेवण्याबाबत मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर येथे याचिका क्र.१००४/१९८९ दाखल केली होती. सदर याचिकेच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दि.२४.०९.१९९० आदेशानुसार राज्यातील अकृषी विद्यापीठे व संलग्नित अशासकीय कला, वाणिज्य, विज्ञान व शिक्षणशास्त्र इ. महाविद्यालयातील शिक्षक पदास विषय व संवर्ग निहाय आरक्षण लागू करण्याचे आदेश संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२४ एप्रिल, १९९५ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले होते. तथापि, विषय व संवर्गनिहाय आरक्षणाच्या धोरणामुळे सामाजिक आरक्षणातील सर्व मागासवर्गीय प्रवर्गांना त्याचा लाभ होत नसल्याचे व त्यामुळे शिक्षक पदास विषयनिहाय आरक्षणाच्या ऐवजी संवर्गनिहाय आरक्षण लागू करण्यात यावे, अशी मागणी विविध स्तरावरुन शासनाकडे करण्यात आली. त्यामुळे संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२२.०१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये संवर्गनिहाय आरक्षण धोरण लागू करण्यात आले. सदरहू दि.२२.०१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये संबधित संस्थेच्या सर्व महाविद्यालयातील एकाच शिक्षकीय संवर्गातील सर्व

विषयातील मंजूर पदे एकत्रित करण्यात यावीत व त्यास दि.१८.१०.१९९७ च्या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणे संवर्गनिहाय आरक्षणाची गणना करण्यात यावी, अशी सुधारणा करण्यात आली.

उपरोक्त दिनांक २२.०१.२०१४ च्या शासन निर्णयाविरुध्द स्त्री शिक्षण प्रसारक मंडळ, नागपूर यांनी मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर येथे याचिका क्र.१६८०/२०१४ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२०.११.२०१४ रोजी पारित केलेल्या आदेशाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१० एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयान्वये दि.२२.०१.२०१४ च्या शासन निर्णयास स्थगिती देण्यात आली. तसेच तद्‌नंतर शासन निर्णय दि.२४.०८.२०१५ अन्वये दि.२४.०४.१९९५ अन्वये घेण्यात आलेला संवर्ग व विषयनिहाय आरक्षण ठेवण्याबाबतचा निर्णय कायम ठेवण्यात आला आहे.

केंद्र शासनाने The Central Educational Institutions (Reservation in Teachers Cadre) Act, २०१९ अन्वये केंद्रीय विद्यापीठे व केंद्रीय शैक्षणिक संस्थांमधील शिक्षकीय पदांच्या सरळसेवा भरतीमध्ये संवर्गनिहाय आरक्षण धोरण लागू केलेले आहे. केंद्र शासनाने विहित केलेल्या आरक्षण धोरणाची राज्यात अंमलबजावणी करताना त्यांचा संबंध उच्च व तंत्र शिक्षण विभाग, कृषि विभाग, वैद्यकीय शिक्षण विभाग, शालेय शिक्षण विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या अधिपत्याखालील महाविद्यालयातील शिक्षकीय पदांच्या सरळसेवा भरतीमध्ये येणार आहे. त्यामुळे केंद्र शासनाने विहित केलेले संवर्गनिहाय आरक्षण धोरण, राज्य शासनाचे प्रचलित आरक्षण धोरण तसेच यासंदर्भातील मा. न्यायालयाचे न्यायनिर्णय यांचा अभ्यास करून केंद्र शासनाने विहित केलेल्या संवर्गनिहाय आरक्षण धोरणाची राज्यातील शैक्षणिक संस्थांमध्ये अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने शासनास शिफारस करण्यासाठी मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

केंद्र शासनाने दि.०९.०७.२०१९ च्या अधिनियामान्वये विहित केलेले शिक्षकीय पदांचे संवर्गनिहाय आरक्षण धोरण राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये तसेच राज्य शासनाच्या इतर विभागांच्या अधिपत्याखालील उच्च शैक्षणिक संस्थांना लागू करण्याच्या अनुषंगाने शासनास शिफारस करण्यासाठी मा. उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | मा. उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री | अध्यक्ष |
| २ | मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) | सदस्य |
| ३ | मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४ | मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| ५ | मा. मंत्री, कृषि व पदुम विभाग | सदस्य |
| ६ | मा. मंत्री सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य |
| ७ | मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग | सदस्य |
| ८ | मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य |
| ९ | मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| १० | प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण | सदस्य सचिव |
| ११ | सचिव (सा.प्र.वि.,१६-ब) | निमंत्रित सदस्य |

२. सदर मंत्रिमंडळ उपसमितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-

केंद्र शासनाने विहित केलेले संवर्गनिहाय आरक्षण धोरण, राज्य शासनाचे प्रचलित आरक्षण धोरण तसेच यासंदर्भातील मा. न्यायालयाचे न्यायनिर्णय यांचा अभ्यास करून केंद्र शासनाने विहित केल्या संवर्गनिहाय आरक्षण धोरणाची राज्यातील शैक्षणिक संस्थांमध्ये कशा पध्दतीने अंमलबजावणी करता येईल, याबाबत शिफारशी करणे.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२११२२४१९०३३५११०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.12.24 19:04:14 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मंत्री, कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८. मा. मंत्री सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२.मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव, (साविस/१६-ब) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.सहसचिव/उपसचिव (मशि/विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.निवड नस्ती (विशि-१)

****